**पिंपरी-चिंचवड महानगरपालिका**
घनकचरा व्यवस्थापन, प्रक्रिया व भराई प्रकल्पाच्या प्रयोजनासाठी जमिनी संपादन करण्याबाबतचा ठराव विखंडीत करण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

नगर विकास विभाग,
**शासन निर्णय क्रमांक** - पीसीसी-३००५/१०२८/प्र.क्र.११७/नवि-२२.
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२., दिनांक- १७ फेब्रुवारी २०१०.

**संदर्भ** : १) आयुक्त, पिंपरी-चिंचवड महानगरपालिका यांचे पत्र क्र. वैद्य/सा.आ./का.वि/६/३५२/२००५, दिनांक २९/५/२००५ व त्यासोबतचा ठराव क्र. ८९०४, दिनांक ०३.०२.२००५.
२) आयुक्त, पिंपरी-चिंचवड महानगरपालिका यांचे पत्र क्र. वैद्य/सा.आ./६/का.वि/५७८/०५, दि. १६/७/२००५
३) आयुक्त, पिंपरी-चिंचवड महानगरपालिका यांचे पत्र क्र. वैद्य/सा.आ./६/का.वि/९८१/०५, दिनांक २/१/०५.
४) या विभागाचा समक्रमांक दिनांक ९ फेब्रुवारी २००७ चा शासन निर्णय.

**प्रस्तावना :-** पिंपरी-चिंचवड महानगरपालिकेच्या मौजे मोशी येथील सध्याचा कचरा डेपो हवाई दलाच्या लोहगाव विमान उड्डाण क्षेत्रामध्ये येत असल्याने तो त्वरीत बंद करुन कचरा डेपोसाठी दुसरी पर्यायी जागा निश्चित करुन ती संपादित करणे आवश्यक होते. केंद्र शासनाच्या नागरी घनकचरा (व्यवस्थापन व हाताळणी) नियम २००० व मा.सर्वोच्च न्यायालयाच्या मार्गदर्शक सूचनानुसार महापालिकेच्या कचरा डेपोसाठी पर्यावरणाच्या दृष्टीने सुयोग्य जागा निश्चित करण्याची मुदत डिसेंबर २००२ तर सदर जागेवर शास्त्रोक्त पध्दतीने घनकचरा व्यवस्थापन प्रकल्प चालू करण्याची मुदत डिसेंबर २००३ पर्यंतची होती. त्यानुसार महापालिकेच्या हद्दीतील जागांचा शोध व तपासणी करता मौजे पुनावळे येथील वन विभागाच्या ताब्यात असलेली स.नं. २४ क्षेत्र सुमारे ५७ एकर जागा निश्चित करण्यात आली.

०२. मौजे पुनावळे येथील घनकचरा व्यवस्थापन प्रक्रिया व भराई हा प्रकल्प केंद्र शासनातर्फे १०० टक्के अनुदानित प्रकल्प आहे. पिंपरी-चिचवड शहराचा वाढता व्याप व भविष्यात प्रकल्पासाठी जागेची जाणवणारी गरज विचारात घेता महापालिकेस पर्यायी कचरा डेपोची आवश्यकता आहे. खाजगी जागा संपादन करणे, खर्चास मान्यता देणेसाठी स्थायी समिती सभेपुढे ठेवणेत आलेला प्रस्ताव ठराव क्रमांक ८९०४ दिनांक ३/२/२००५ अन्वये दप्तरी दाखल करणेत आलेला आहे.

सदर घनकचरा व्यवस्थापन प्रकल्पासाठी वन जमिनी व भोवतालच्या खाजगी मालकांच्या जमिनी संपादन करण्याची कार्यवाही गतीमानतेने करण्यासाठी आणि घनकचरा व्यवस्थापक, प्रक्रिया व भराई प्रकल्प त्वरीत उभारुन कार्यान्वित करण्याची आवश्यकता असल्याने, आयुक्त, पिंपरी-चिंचवड महानगरपालिका यांनी

या प्रकरणी अभिवेदन/ निवेदने प्राप्त झालेली नाहीत. त्यामुळे आयुक्तांनी प्रस्तावित केल्यानुसार विषयाधीन ठराव विखंडीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-** मौजे पुनावळे येथील स.नं.२४ क्षेत्र सुमारे ५७ एकर या क्षेत्राजवळील खाजगी जागा संपादन करण्याच्या खर्चास मान्यता देण्यासाठी सादर केलेला प्रस्ताव ठराव क्रमांक ८९०४ दिनांक ३/२/२००५ अन्वये स्थायी समितीने दप्तरी दाखल केलेला आहे. घनकचरा व्यवस्थापन प्रक्रिया व भराई प्रकल्पाची आवश्यकता व निकड पाहता या विभागाच्या समक्रमांकाच्या दिनांक ९/२/२००७ च्या शासन निर्णयान्वये निलंबित केलेला स्थायी समिती ठराव क्रमांक ८९०४, दिनांक ३/२/२००५ मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम, १९४९ च्या कलम ४५१ मधील तरतूदीस अधिन राहून विखंडीत करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**(सुनील कोठेकर )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रत :**

१. मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. सचिव, (न.वि.२) नगर विकास विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई-३२.
३. आयुक्त, पिंपरी चिंचवड महानगरपालिका, पिंपरी.
४. नगर सचिव, पिंपरी चिंचवड महानगरपालिका, पिंपरी, पुणे.
५. कार्यासन नवि२२ (निवडनस्ती)